**महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास "१३ कार्यालयीन खर्च" आणि "११ देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी वर्ष २०१८-१९ साठी पुनर्विनियोजनाने अनुदान वितरित करणेबाबत..**

## महाराष्ट्र शासन
### अल्पसंख्याक विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०१८/प्र.क्र.१२४/कार्या-४

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १०.०१.२०१९

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०१८/प्रक्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: बियुडी २०१८/प्र.क्र.१२४/कार्या-४, दि.२७ एप्रिल, २०१८
३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: अ.वि.वि. २०१८/प्र.क्र.७४/का.७, दि.०५.१०.२०१८
४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: बियुडी २०१८/प्र.क्र.१२४ (भाग-१)/कार्या-४, दि.१७.१०.२०१८
५) उप सचिव तथा सदस्य, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण यांचे पत्र क्र. जा.कै.२०१८/म.रा.व.न्या./आस्था-लेखा/५३६, दि.२०.११.२०१८
६) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक: अ.वि.वि. २०१८/प्र.क्र.७४/का.७, दि.०७.०१.२०१९

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी पुनर्विनियोजनाद्वारे मंजूर असलेल्या अनुदानातून "१३ कार्यालयीन खर्च" आणि "११ देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दिष्टासाठी पुनर्विनियोजनाने अनिवार्य खर्चासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात "१३ कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टासाठी संदर्भ क्र.२ व ४ आणि येथील शासन निर्णयान्वये रु.७,५८,०००/- आणि "११ देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी संदर्भ क्र.२ आणि ३ येथील शासन निर्णयान्वये अनिवार्य खर्चासाठी रु.१,४६,६००/- इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे. आता महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाने अनुदान उपलब्ध करुन दिल्याने "१३ कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टासाठी रु.७,५०,०००/- आणि "११ देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दीष्टासाठी रु.१,५०,०००/- असे एकूण रु.९,००,०००/- इतके अनुदान अध्यक्ष, महाराष्ट्र

राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च "मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८), ""१३ कार्यालयीन खर्च" आणि "११ देशांतर्गत प्रवास खर्च" योजनेत्तर" या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.३०७/२०१८/व्यय-१, दि.३१.१२.२०१८ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११०१३०१०१४६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2019.01.10 15:47:44 +05'30'

**( म.स.चौकेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग
२. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद,
३. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
७. उपसचिव (कोषा/प्र.१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. कार्यासन अधिकारी (का-७/का-५), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.